पंचायत समिती, वसमत (जि. हिंगोली) नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

## महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०२२/प्र.क्र.७८/बांधकाम-४

५ वा मजला, २५ मर्झबान पथ, बांधकाम भवन,

फोर्ट, मुंबई, ४०० ००१

तारीख : ०९ ऑगस्ट, २०२३

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांक :** ग्राम विकास विभाग क्र. पंसई-२०१३/प्र.क्र.२३७/बांधकाम-४, दिनांक २६ मार्च, २०१८.

२) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली यांचे पत्र क्रमांकः** जिपहिं/बांध/कावी/१२२७/२०२२, दिनांक ०५ मे, २०२२.

३) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली यांचे पत्र क्रमांकः** जिपहिं/बांध/कावी/२२८०/२०२२, दिनांक २२ जून, २०२२.

४) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली यांचे पत्र क्रमांकः** जिपहिं/बांध/कावी/२८३०/२०२२, दिनांक २० सप्टेंबर, २०२२.

**प्रस्तावना :-**

अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली यांनी वाचा मधील अनुक्रमांक २ ते ४ येथील पत्रांन्वये पंचायत समिती, वसमत (जि. हिंगोली) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रु.२७१.८२ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास दिलेली प्रशासकीय मान्यता रद्द करुन नव्याने प्रस्तुत इमारतीच्या नविन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

०२. पंचायत समिती, वसमत (जि. हिंगोली) येथील अस्तित्वातील इमारत १९६१ मध्ये लोडबेअरींग पद्धतीची बांधण्यात आलेली आहे. प्रस्तुत इमारत मोडकळीस आलेली आहे. सदर इमारत जुनी, जीर्ण व धोकादायक झालेली असून भिंतींना तडे गेलेले आहेत. त्यामुळे अधिकारी व कर्मचारी यांना बसण्यासाठी अपूरी पडत आहे. पंचायत समिती, वसमत, (जि. हिंगोली) नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम वसमत येथील बांधकाम जिल्हा परिषदेच्या ताब्यात असलेल्या सर्व्हे क्रमांक ,१५०पोट नं५ . या १६९३.०६ चौ. मी. या मोकळ्या क्षेत्रावर करण्यात येणार आहेसदर जागा .

हीपंचायत समिती ,वसमत यांच्या नावावर आहे. पंचायत समिती, वसमत, जि.हिंगोली ही "ब" वर्ग दर्जाची असून त्यांनी १६९३.०६ चौ. मी. इतक्या क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित केले आहे. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली यांनी पंचायत समिती, वसमत नवीन प्रशासकीय इमारतीकरिता उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ सा. बां. प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे क्रमांक PBN(5)05/DRG NO. 01 या नमुना नकाशावर आधारित, सन २०१९-२० च्या दरसूचीवर आधारित रू.११३७.०० लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. सदर अंदाजपत्रक हे कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, हिंगोली, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड यांनी साक्षांकित केलेले आहे. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली यांनी प्रस्तावासोबत पंचायत समितीच्या ठरावाची प्रत, नमुना नकाशाची प्रत, लीड चार्ट, क्वॅरी चार्ट, ले-आऊट प्लॅन, साईट प्लॅन, स्थळ दर्शक नकाशा, अस्तित्वातील इमारत बांधकामाचे फोटो इत्यादी कागदपत्रे सादर केलेली आहेत.

**०३.** अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती, सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील प्रकरण-३, नियम-२६२ मधील तरतूद विचारात घेता, ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या उक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक २६ मार्च, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये, पंचायत समिती, वसमत (जि. हिंगोली) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रु.२७१.८२ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास दिलेली प्रशासकीय मान्यता रद्द करून नव्याने प्रस्तुत इमारतीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.११३७.०० लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पंचायत समिती**,** वसमत (जि. हिंगोली) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रूपये ११,३७,००,०००/- (रूपये अकरा कोटी सदोतीस लक्ष फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. प्रस्तुत बांधकामास तांत्रिक मान्यता देण्यापुर्वी संकल्पन तपासून घेणे आवश्यक राहील.
२. प्रस्तुत इमारतीचे बांधकाम मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा. बां. मंडळ, मुंबई यांच्याकडील विहित नमुना आराखड्यानुसार हाती घेण्यापूर्वी, स्थानिक नगररचना प्राधिकरणाची तसचे अग्निशमन यंत्रणेची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.
३. पंचायत समिती, वसमत (जि. हिंगोली) प्रशासकीय इमारतीकरिता शासन निर्णय, सा. बां. वि. क्र. सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत

फर्निचर/मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करून घेणे बंधनकारक राहील.

४. नियोजित आराखड्यात महिला पदाधिकाऱ्यासाठी प्रसाधनगृहासह विश्रांती कक्षाचे संकल्पन करण्यात येवून, सदर व्यवस्था इमारतीमध्ये निर्माण करण्यात यावी.

५. प्रस्तुत प्रशासकीय इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुवीजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:र्भरण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन - सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

६. प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करून, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

७. या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

८. या कामी प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो संबंधित पंचायत समिती/जिल्हा परिषदेने सोसावा.

९. प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

१०.प्रत्यक्ष इमारतीचे बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग क्र.ईएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१ / दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

०२. पंचायत समिती, वसमत (जि. हिंगोली) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे.

| General Abstract For Construction of Vasamat P. S. Administrative Building Dist. Hingoli | | |
|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | **Cost (In Rs.)** |
| **1** | Cost of Building Work (Including Compound Wall, Sump, Parking) - A | 63602632.00 |
| 2 | Add 11 % for Electrification | 6996290.00 |
| 3 | Internal Furniture Works G. F., F. F. S. F. | 8000000.00 |
| 4 | Fire Fighting arrangement L. Sum | 1000000.00 |
| 5 | Plantation Lump Sump | 1000000.00 |
| | **Total Amount (B)** | **80598922.00** |
| 6 | Add Royalty Charges | 620372.00 |
| 7 | Add Testing Charges | 88355.00 |
| 8 | Cost of Dismaintling Existing Structure | 765427.00 |
| 9 | Add 18 % for GST (On B) | 14507806.00 |
| 10 | Add 8 % for Price Variation | 6447914.00 |
| 11 | Add 3 % Contingencies | 2417968.00 |
| 12 | Add for Water Supply | 1000000.00 |
| 13 | Add for Solar systeme | 2000000.00 |
| 14 | Add 1 % for Computerization | 805989.00 |
| 15 | Add 0.50 (Insurance of Contract) on A | 402995.00 |
| 16 | Add 5 % Centage Charges | 4029946.00 |
| | **Net Cost Of Project** | **113686694.00** |
| | **Says in Rs.** | **11,36,87,000/-** |

०३. उपरोक्त बांधकामासाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरूपात, टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करून दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

०४. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उप विभाग-पाच, अ. क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि. क्र. १३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०९१२५६४४२६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PATIL PRASHANT VINAYAKRAO
Date: 2023.08.09 14:43:43 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
२. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
४. मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
६. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली.
८. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली.
९. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली.
१०. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, हिंगोली.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा हिंगोली.
१२. जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, हिंगोली.
१३. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.

१४. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
१५. सभापती, पंचायत समिती, वसमत, (जि. हिंगोली).
१६. गट विकास अधिकारी, पंचायत समिती वसमत, जिल्हा हिंगोली.
१७. निवडनस्ती, कार्यासन बांध-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.